वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत मका संशोधन केंद्र, कोटनांद्रा व डोईफोडा, जि. औरंगाबाद करीता निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : मकृवि-१२२३/प्र.क्र.१३७/७-अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १४ जुलै, २०२३.

**संदर्भ:-** १) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दि.१२.०४.२०२३.

२) कृषि व पदुम विभाग,शासन निर्णय क्र.मकृवि-१२२२/प्र.क्र.२०९/७-अे,दि.२८.०६.२०२३.

३) कृषि व पदुम विभाग,शासन निर्णय क्र.मकृवि-१२२३/प्र.क्र.१३७/७-अे,दि.१३.०७.२०२३.

**प्रस्तावना:-**

कृषि व पदुम विभागाच्या वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत मौजे कोटनांद्रा व डोईफोडा, ता.सिल्लोड, जि.औरंगाबाद येथील शासकीय जागेवर मका संशोधन केंद्र स्थापन करण्यास व सदर संशोधन केंद्राच्या रु.१२०६.५० लक्ष अनावर्ती खर्चास (बांधकाम व इतर) व रु.१०११.४३ लक्ष आवर्ती खर्चास संदर्भाधीन क्र.०२ च्या शासन निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात आली आहे. वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत मका संशोधन केंद्र, कोटनांद्रा व डोईफोडा, जि.औरंगाबाद येथील कार्यालय, निवासस्थान व इतर अनुषांगिक कामासाठी एकूण रु.१०००.०० लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय रक्कमेच्या प्रस्तावास संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात (२४१५०१०५) या लेखाशिर्षांतर्गत, ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टासाठी वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत मका संशोधन केंद्र, मौजे कोटनांद्रा व डोईफोडा, ता.सिल्लोड, जि.औरंगाबाद येथील बांधकामाकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून अनावर्ती खर्चाकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मागणी क्र.डी-३, ०१-पीकसंवर्धन, १२०,इतर संस्थांना सहाय्य, (००)(०९) वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी या कृषि विद्यापीठास सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४१५ ०१०५) या लेखाशिर्षांतर्गत ३१,सहायक अनुदान (वेतनेतर) या बाबीकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून अनावर्ती खर्चाकरीता रु.५००.०० लाख (अक्षरी पाच कोटी) एवढे अनुदान वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे. याबाबतचा सविस्तर तपशिल पुढीलप्रमाणे दर्शविण्यात आला आहे.

(रु.लाखात)

| अ.क्र. | योजनेचे नाव | लेखाशिर्ष व उद्दीष्ट | अर्थसंकल्पीय तरतूद (सन २०२३-२०२४) | विभागाकडून वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत मका संशोधन केंद्र, कोटनांद्रा व डोईफोडा, ता.सिल्लोड, जि. औरंगाबाद (अनावर्ती खर्च) | (००)(०९) वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४१५०१०५) ३१,सहायक अनुदाने(वेतनेतर) | ५०००.०० | ५००.०० |
| **एकूण** | | **(अक्षरी रुपये पाच कोटी फक्त)** | | |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

२) कृषि विद्यापीठांनी योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा.

३) वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

४) ज्या योजनांतर्गत योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधित कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.

५) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने, कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सूत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मूल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

६) कृषि विद्यापीठांना त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच, महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

७) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम, १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम, १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता, १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिकाऱ्यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांनी उपरोक्त अटी व शर्तीचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

३. या प्रीत्यर्थचा खर्च सन २०२३-२४ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. उपविभागीय कृषि अधिकारी, परभणी, या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान शासन निर्णय क्रमांक कृषि व सहकार विभाग क्रमांक अेजीयु-१०७२/१८४७१/व्ही, दिनांक २७ सप्टेंबर १९७२ आणि शासन निर्णय क्रमांक कृषिवि-२००३/सीआर-३५/२०-अे,दिनांक २५/४/२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

५. हे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ व १४४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार, तसेच, वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ च्या परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०७१४२०१५०६४७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=22dfe162525b696c1facc3a8ddb26b639c76b455434e4cadbb3cd50474dcc58f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=60AE0791D92611A135CE51A5EE439203FDBDB395146D132620B3437EDED658CE, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2023.07.14 20:18:07 +05'30'

**( मिताली चौधरी )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
२. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
३. सदस्य सचिव तथा महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
४. कुलगुरु, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी.
५. कुलसचिव, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी.
६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, बांधकाम भवन, स्नेह नगर, औरंगाबाद, ४३१ ००५.
७. सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
८. नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी.
९. विद्यापीठ अभियंता, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी.
१०.महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर.
११.महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी.

१३.उपकोषागार अधिकारी, परभणी.

१४.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.

१५.उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.

१६.जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी.

१७.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१८.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.

१९.कार्यासन (१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

२०.निवडनस्ती-७अे.